सहाय्यक वन सरंक्षक संवर्गातील अधिकाऱ्याची बदली...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग, मंत्रालय,**
**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०१८/प्र.क्र.८१/फ-८.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० जुलै, २०१८.

**संदर्भ** - शासन आदेश महसूल व वन विभाग क्र. एमएफएस-२०१८/प्र.क्र.६८(१)/फ-८, दि.३१/०५/२०१८.

**शासन आदेश :**

महाराष्ट्र वनसेवा, गट-अ (वरीष्ठ श्रेणी) मधील सहाय्यक वन सरंक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) (वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० + ग्रेड पे रु.५०००) या संवर्गातील खाली नमूद अधिकारी यांच्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कामे पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर बदलीने सुधारीत पदस्थापना करण्यात येत आहे. :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व सद्याची पदस्थापना | अशंत: बदल करून सुधारीत पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.जी.एस. साबळे सहाय्यक वनसंरक्षक, (सामाजिक वनीकरण) बीड | संदर्भाधीन दि.३१/०५/२०१८ च्या शासन आदेशान्वये सहाय्यक वनसंरक्षक-२ (सामाजिक वनीकरण) पुणे या पदावर बदलीने देण्यात आलेल्या पदस्थापनेमध्ये अशत: बदल करण्यात येत असून सहाय्यक वनसंरक्षक, (कॅम्पा व वन्यजीव) सोलापूर या पदावर सुधारीत पदस्थापना देण्यात येत आहे | अधिनियम २००५ मधील कलम ४ (५) नुसार सुधारीत पदस्थापना (रिक्त पदी) (विनंतीनुसार) |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदांवर अन्य अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे.

तसेच, संबंधित अधिकाऱ्याला नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास anil.dhas@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

४. संबंधित अधिकाऱ्याला शासनाच्या पुर्वपरवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्याला मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार संबधित अधिकारी तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०७३०१३२८२९७८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.07.30 13:33:07 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे/ औरंगाबाद
५) उपवनसंरक्षक (प्रा.)सोलापुर
६) वनसंरक्षक सामाजिक वनीकरण, औरंगाबाद
७) महालेखापाल,महाराष्ट्र-१ /२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १/२ मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, बीड/पुणे/सोलापूर
९) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव

१०) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
११) सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१२) संबंधित अधिकारी ( प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत)
१३) वन विभागातील सर्व कार्यासने
१४) निवड नस्ती (फ-८ कार्यासन).